**प्रधान मंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत - प्रति थेंब अधिक पीक घटकांतर्गत सन २०२०-२१ या वर्षात सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र हिश्श्याच्या वितरीत निधीच्या प्रमाणात राज्य हिश्श्याचा उर्वरित रु.४३४८ लक्ष निधी वितरीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रकृसिं-०३२१/प्र.क्र.५८/१४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १९ जानेवारी, २०२२

**संदर्भ :**

१. प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना - प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाच्या केंद्र शासनाने निर्गमित केलेलया मार्गदर्शक सूचना.
२. केंद्र शासनाचे पत्र क्र. १७-३/२०२०-RFS-III, दि. १८ मे, २०२०.
३. कृषि व पदुम विभागाचे पत्र क्र. PMKSY-0120/C.R.01/14-A, दि. १६ मार्च, २०२० अन्वये निर्गमित राज्य स्तरीय मान्यता समितीच्या (SLSC) ९ व्या बैठकीचे इतिवृत्त.
४. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. १८-१०/२०२०-RFS-III (FTS-८४३६४), दि. ११ ऑगस्ट, २०२०.
५. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण-०५२०/प्र.क्र.५८/१४-अे, दि. ०१ जानेवारी, २०२०.
६. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. १८-१०/२०२०-RFS-III (FTS-८४३६४), दि. २४ मार्च, २०२१.
७. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण-०५२०/प्र.क्र.५८/१४-अे, दि. ३१ मार्च, २०२१.
८. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण-०५२०/प्र.क्र.५८/१४-अे, दि. ०८ जून, २०२१.

**प्रस्तावना :**

सन २०१५-१६ पासून प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत-प्रति थेंब अधिक पीक घटकाची अंमलबजावणी राज्यात करण्यात येत आहे. सदर घटकामध्ये सुक्ष्म सिंचन व पाणी व्यवस्थापनाच्या पुरक बाबी अशा दोन उप घटकांचा समावेश आहे. यामध्ये केंद्र व राज्य हिश्श्याच्या निधीचे प्रमाण ६०:४० असे आहे.

केंद्र शासनाने प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत-प्रति थेंब अधिक पीक घटकासाठी सन २०२०-२१ या वर्षामध्ये केंद्र हिश्श्याचा रु. ३०००० लक्ष निधी वितरीत केला असून त्यामध्ये सर्वसाधारण प्रवर्गासाठीच्या रु. २३४०० लक्ष निधीचा समावेश आहे. केंद्र हिश्श्याच्या सदर निधीच्या प्रमाणात समरूप राज्य हिश्श्याचा रु. १५६०० लक्ष निधी उपलब्ध करुन देणे आवश्यक होते तथापि, संदर्भाधिन दि. ०१ जानेवारी, २०२१, दि. ३१ मार्च, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये केंद्र हिश्श्याचा रु. २३४०० लक्ष व राज्य हिश्श्याचा रु. ७०१२ लक्ष निधी सन २०२०-२१ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीतुन व दि. ०८ जून, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्य हिश्श्याच्या उर्वरित रु. ८५८८ लक्ष निधीपैकी रु.४२४० लक्ष निधी सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीतुन आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यात आला आहे. सबब राज्य हिश्श्याच्या उर्वरीत रु. ४३४८ लक्ष निधीचे वितरण सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीतुन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

१. प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत-प्रति थेंब अधिक पीक घटकाच्या अंमलबजावणीसाठी सन २०२०-२१ मध्ये **सर्वसाधारण प्रवर्गाकरिता** प्राप्त केंद्र हिश्श्याच्या समरूप राज्य हिश्श्याच्या **रु. ४३४८ लक्ष (रुपये त्रेचाळीस कोटी अठ्ठेचाळीस लाख फक्त)** निधीचे वितरण बाकी होते. या शासन निर्णयान्वये सदर ₹४३४८ लक्ष निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. परिच्छेद क्र. १ मध्ये नमूद केल्यानुसार, प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत-प्रति थेंब अधिक पीक घटकांतर्गत **राज्य हिस्स्याचा ₹ रु. ४३४८ लक्ष (रुपये त्रेचाळीस कोटी अठ्ठेचाळीस लाख फक्त)** निधी उपलब्ध करुन दिला असून तो योजनेच्या राज्य हिस्स्याच्या पुढील लेखाशिर्षांतर्गत सन २०२१-२२ मध्ये अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

| प्रवर्ग | राज्य हिस्सा |
|---|---|
| **सर्वसाधारण** | **मागणी क्रमांक डी -३**<br>२४०१पीक संवर्धन,<br>११३ कृषि अभियांत्रिकी,<br>(००)(२१) प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना - (सूक्ष्म सिंचन) (केंपुयो) (राज्य हिस्सा ४०%)<br>(सर्वसाधारण)(कार्यक्रम)<br>(२४०१ A९९६) ३३-अर्थसहाय्य |

३. सदर योजनेंतर्गत वितरीत करण्यात येणाऱ्या निधीच्या आहरण व संवितरणासाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे. |
| २ | जिल्हास्तर | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी. |

४. सदर निधी सन २०२०-२१ या वर्षात वितरीत केलेल्या केंद्र हिश्श्याच्या निधीसाठी समरूप राज्य हिश्श्याचा निधी म्हणून वापरण्यात यावा.

५. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत - प्रति थेंब अधिक पिक (सूक्ष्म सिंचन) घटकाच्या मार्गदर्शक सूचना, तसेच केंद्र शासनाच्या संदर्भाधीन दि.१८ मे, २०१९, दि. ११ ऑगस्ट, २०२० व दि. २४ मार्च, २०२१ च्या शासन पत्रांमधील सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

६. अनुदानाचे वितरण महाडीबीटी पोर्टलव्दारे करण्यात यावे.

७. उपरोक्त निधी खर्च करताना तो विहीत कार्यपध्दती अनुसरून सर्व वित्तीय कायदे / प्रक्रियांचे / वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत / C.V.C. तत्वानुसार / प्रचलित शासन निर्णय / नियम/परिपत्रक/ तरतूदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम / अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रीय कार्यालयाची राहील.

८. उपरोक्त निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठविण्यात यावी.

९. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून त्यानुसार या कार्यक्रमाची अंमलबजावणी राज्यातील सर्व जिल्हयात करण्याकरिता जिल्हास्तरावर अंलबावयाच्या योजनेच्या अंमलबजावणीची कार्यपध्दती बाबतच्या सूचना निर्गमित करण्याकरिता संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

१०. हा शासन निर्णय वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १४ ऑक्टोंबर, २०२१ नुसार विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने निर्गमित करण्यात येत आहे.

११.सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०११९१११११२५९४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRIKANT C ANDGE

Digitally signed by SHRIKANT C ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPT., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, pseudonym=1CC019CBB7F0A77E397F15793DF809A69806ED98, serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE74CFFD3A95F2AC3C192E9C991F358271, cn=SHRIKANT C ANDGE
Date: 2022.01.19 11:12:57 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (कृषी व पणन / फलोत्पादन), मंत्रालय, मुंबई-३२
२) मा.राज्यमंत्री (कृषी व पणन) मंत्रालय, मुंबई-३२
३) सचिव (कृषी), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती)
५) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
६) सर्व संचालक / सह संचालक, कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
७) सर्व विभागीय कृषी सहसंचालक
८) जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी (सर्व)
९) सर्व कृषी विकास अधिकारी/सर्व उपविभागीय कृषी अधिकारी/सर्व तालुका कृषी अधिकारी/
१०) सर्व मंडळ कृषी अधिकारी
११) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर

१३) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१४) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
१५) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी.
१६) उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
१७) उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
१८) सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषी) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१९) निवडनस्ती.